**खुल्या प्रवर्गातील निवड झालेल्या महिला उमेदवाराचे नॉन क्रिमीलेअर (Non Creamy-layer) प्रमाणपत्र पडताळणी इतर मागासवर्ग, सामाजिक व शैक्षणिक मागास प्रवर्ग, विमुक्त जाती, भटक्या जमाती आणि विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग शासन निर्णय दि.३१.१.२०२० नुसार करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- संकीर्ण २०२०/प्र.क्र.७७ /कार्या-२,**
नवीन प्रशासकीय इमारत, तिसरा मजला, मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २९ जुलै, २०२०.

वाचा :-

१. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्रमांक-८२/२००१/मसेआ-२००० / प्रक्र.४१५/का-२, दि.२५.०५.२००१.
२. शासन निर्णय , महिला व बाल विकास विभाग, क्रमांक- संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१९१/का-२,दिनांक १५.१२.२०१७.
३. शासन निर्णय , महिला व बाल विकास विभाग, क्रमांक- संकीर्ण-२०१७/प्र.क्र.३०/का-२,दिनांक १०.०४.२०१७.
४. शासन निर्णय इतर मागासवर्ग, सामाजिक व शैक्षणिक मागास प्रवर्ग, विमुक्त जाती, भटक्या जमाती आणि विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभागा क्र.सीबीसी-२०२०/ प्र.क्र.१८ /मावक, दि.३१.०१.२०२०.
५. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र.मबवावि/२०२०/३०% आरक्षण/का-६/१५६६, दि.२०.३.२०२०.

प्रस्तावना :-

महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय वाचा क्र.१ ,२ आणि ३ अन्वये, शासकीय, निमशासकीय व शासन अनुदानीत संस्था इ.मध्ये खुल्या प्रवर्गातून निवड झालेल्या महिला उमेदवाराची नॉन क्रिमीलेअर प्रमाणपत्र पडताळणीची कार्यपध्दती निश्चित करण्यात आली आहे. त्यानुसार सहआयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांना गट-अ आणि गट-ब तर विभागीय उपआयुक्त, महिला व बाल विकास यांना गट-क आणि गट-ड संवर्गातून निवड झालेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या नॉन क्रिमीलेअर प्रमाणपत्र पडताळणीचे अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत.

त्याचप्रमाणे इतर मागासवर्ग, सामाजिक व शैक्षणिक मागास प्रवर्ग, विमुक्त जाती, भटक्या जमाती आणि विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभागाने शासन निर्णय वाचा क्र.४ नुसार, महाराष्ट्र राज्यातील इतर मागास प्रवर्ग, विमुक्त जाती, भटक्या जमाती, विशेष मागास प्रवर्ग तसेच शासन सेवेतील सरळ सेवा कोटयातील पदभरतीसाठी आरक्षणाची टक्केवारी निश्चित करण्यात आलेल्या खुल्या प्रवर्गातील महिला, आर्थिकदृष्टया मागास प्रवर्गातील उमेदवार, एस.ई.बी.सी. क्षेत्रातील आरक्षण धोरणानुसार आरक्षणाचा लाभ घेणारे मराठा समाजातील उमेदवार इ. यांना सक्षम प्राधिकाऱ्यांमार्फत देण्यात आलेल्या नॉन क्रिमीलेअर प्रमाणापत्राची (उत्पन्नाच्या प्रमाणपत्राची) वैधता पडताळणीसाठी सक्षम यंत्रणा निर्माण केली असून नॉन क्रिमीलेअर प्रमाणपत्राची वैधता पडताळणीसाठी समिती गठीत करण्यात आली आहे.

महिला व बाल विकास विभागाच्या वाचा क्र.१,२ आणि ३ येथील शासन निर्णयान्वये, खुल्या प्रवर्गातून निवड झालेल्या महिलांच्या नॉन क्रिमीलेअर प्रमाणपत्र पडताळणीची कार्यपध्दती निश्चित असतांना याच प्रयोजनासाठी इतर मागासवर्ग, सामाजिक व शैक्षणिक मागास प्रवर्ग, विमुक्त जाती, भटक्या जमाती आणि विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभागाकडून शासन निर्णय वाचा क्र.४ अन्वये कार्यपध्दती निश्चित कऱण्यात आली आहे. एकाच प्रयोजनासाठी दोन विभागाकडून स्वतंत्र कार्यपध्दती निश्चित केल्यामुळे यामध्ये द्विरूक्ती होत असून खुल्या प्रवर्गातून निवड झालेल्या महिलांच्या नॉन क्रिमीलेअर प्रमाणपत्र पडताळणीबाबत संभ्रम निर्माण होत आहे.

सदर द्विरूक्ती टाळण्यासाठी आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी प्रस्तावित केल्यानुसार खुल्या प्रवर्गातून निवड झालेल्या महिला उमेदवाराचे नॉन क्रिमीलेअर प्रमाणपपत्र पडताळणीची कार्यवाही उपरोक्त वाचा क्र.४ येथील शासन निर्णयातील तरतुदीनुसार विभागीय आयुक्त(महसूल) यांच्या अध्यक्षतेखाली गठीत समितीकडून करणेबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

या शासन निर्णयाद्वारे शासकीय, निमशासकीय व शासन अनुदानीत संस्था इ.मध्ये खुल्या प्रवर्गातून निवड झालेल्या महिला उमेदवाराचे नॉन क्रिमीलेअर प्रमाणपत्र पडताळणीची कार्यवाही महिला व बाल विकास विभागाच्या वाचा क्र.१,२ आणि ३ येथील शासन निर्णयातील तरतूदी ऐवजी इतर मागासवर्ग, सामाजिक व शैक्षणिक मागास प्रवर्ग, विमुक्त जाती, भटक्या जमाती आणि विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभागाच्या शासन निर्णय दि.३१.१.२०२० अन्वये गठीत केलेल्या समितीकडून करण्यात यावी असा निर्णय घेण्यात येत आहे .

त्यानुसार सहआयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे व विभागीय उपआयुक्त, महिला व बाल विकास यांच्याकडे खुल्या प्रवर्गातील महिलांच्या नॉन क्रिमीलेअर पडताळणीची प्रलंबित असलेली प्रकरणे संबंधीत विभागीय आयुक्त(महसूल) यांच्याकडे हस्तांतरीत करण्यात यावीत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२००७२९१८०१२९९८३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

RAVINDRA SITARAM JARANDE

Digitally signed by RAVINDRA SITARAM JARANDE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=186d0f0fdd27c79b9b3f859a90ec537946c37d5876e64ce525d082e58e494c85, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBA, serialNumber=4d2dc3dbd5c0f35a66a84c93b4cead367c64cc2bc9d7391e9a053988a2f81b64, ou=WOMEN AND CHILD DEVLOPMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=RAVINDRA SITARAM JARANDE
Date: 2020.07.29 17:34:50 +05'30'

**( र. सि. जरांडे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. महाराष्ट्राचे राज्यपाल महोदयांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री महोदयांचे अ.मु.स./प्र.स./सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री महोदयांचे सचिव/ खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मंत्री व राज्यमंत्री (सर्व), मंत्रालय, मुंबई.
५. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा, विधानभवन, मुंबई.

६. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद, विधानभवन, मुंबई.
७. अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन प्रशासकीय विभाग (सर्व) यांना प्रत अग्रेषित करुन विनंती करण्यात येते की, सदर शासन निर्णयातील तरतुदी त्यांच्या अधिनस्त क्षेत्रीय कार्यालयांच्या निदर्शनास त्वरित आणाव्यात.
८. अप्पर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग (सेवा), मंत्रालय, मुंबई.
९. अप्पर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. प्रधान सचिव, इमाव साशैमाप्र विजाभज आणि विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
११. सचिव, (महिला व बाल विकास) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१२. सर्व विभागीय आयुक्त, महसूल.
१३. सर्व जिल्हाधिकारी.
१४. सर्व निवासी उपजिल्हाधिकारी.
१५. सर्व विभागीय आयुक्त कार्यालयातील उपायुक्त (महसूल).
१६. सर्व विभागीय आयुक्त कार्यालयातील उपायुक्त (मावक).
१७. सर्व विभागीय आयुक्त कार्यालयातील उपायुक्त (सामान्य)
१८. सर्व अप्पर आयुक्त (महसूल)
१९. सर्व अतिरिक्त जिल्हाधिकारी.
२०. सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी.
२१. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी (जिल्हा परिषद).
२२. आयुक्त समाजकल्याण, पुणे.
२३. संचालक, इमाव साशैमाप्र विजाभज आणि विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे.
२४. सर्व प्रादेशिक उपायुक्त समाजकल्याण.
२५. सर्व सहाय्यक आयुक्त समाजकल्याण.
२६. सर्व उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी महिला व बालविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२७. निवड नस्ती (कार्या-२).